**महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील**
**अधिका-यांच्या बदल्या / नियुक्त्या.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन आदेश, क्रमांक : मविसे १०/२०१०/प्र.क्र.३२७/ आस्था-३**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२**
**दिनांक:- १५ जानेवारी, २०११**

**संदर्भ :-** शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग क्र.एस.आर.व्ही-२०१०/प्र.क्र.२७९/२०१०/१२ दि.२८.१०.२०१०

**आदेश:-**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन शासन निर्णयान्वये **गडचिरोली जिल्हयातील सर्व संवर्गातील रिक्त पदे सर्वोच्च प्राधान्याने तात्काळ भरण्याचे निर्देश देण्यात आले आहेत.** तद्नुषंगाने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील कलम ४ (४) व (५) मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-यांच्या मान्यतेने ग्राम विकास व जलसंधारण विभागातील **श्री.एच.टी.जगताप, प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, कोल्हापूर** यांच्या बदलीचे आदेश शासन देत आहे. या आदेशान्वये त्यांची पदस्थापना आता **प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा, जि.गडचिरोली** या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. श्री.एच.टी.जगताप यांनी वरील प्रमाणे बदलीच्या आदेशाच्या दिनांकापासून १० दिवसात बदलीच्या पदावर रुजु व्हावे. त्याप्रमाणे रुजु न झाल्यास त्यांच्या बाबतीत सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. एसआरव्ही - २०१०/प्र.क्र.२७९/२०१०/१२ दि.२८.१०.२०१० मधील तरतूदीनुसार कारवाई करण्यात येईल याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. श्री.एच.टी.जगताप यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२ / २५६७ / २८ / अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

४. कार्यकारी अध्यक्ष नियामक मंडळ तथा मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद कोल्हापूर यांनी श्री.जगताप यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तातडीने पदमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे व तसे केल्याचे शासनास विनाविलंब कळवावे.

५. श्री.एच.टी.जगताप यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

६. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०११५२०१०३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सरिता बांदेकर-देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति

विभागीय आयुक्त पुणे/नागपूर
मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद, कोल्हापूर/गडचिरोली
महालेखापाल- १/२ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर
**संबंधित अधिकारी व्दारा मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद यांचे मार्फत**

मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
मा.सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक.
कार्यासन क्रमांक : आस्था - २ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
निवड नस्ती ( कार्यासन क्रमांक :आस्था-३ ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग.